201105261112&5001

**पिंपरी चिंचवड महानगरपालिका**

श्री. अनिल किसन रास्ते, गटरकुली यांना सेवेतून काढून टाकण्याऐवजी एक वेतनवाढ स्थगित करुन सेवेत ठेवण्याबाबत पारित केलेला ठराव क्र. १६१११ चे निलंबन मागे घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक: पीसीसी ३००७/६१९/प्र.क्र. ३३८ /नवि-२२

मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक: - १९ मे, २०११

**वाचा :-** १) आपले पत्र क्र. प्रशा/६/कावि/१५४/०७, दि. २२ मार्च, २००७ व त्यासोबतचा स्थायी समिति ठराव क्र. १६१११ दि. २२ नोव्हेंबर, २००६

२) सहाय्यक आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांचे पत्र क्र. प्रशासन/६/कवि/१२०/१० दि. २६.२.२०१०

३) या विभागाचा समक्रमांक दि.२९ ऑक्टोंबर, २००७ चा शासन निर्णय.

**प्रस्तावना:-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवर श्री.अनिल किसन रास्ते हे गटरकुली पदावर काम करीत असतांना ते एकूण ३२९ दिवस विनापरवाना गैरहजर राहिले आहेत. त्यासंदर्भात त्यांना मनपाकडून अंतिम कारणे दाखवा नोटीस बजाविण्यात आली होती. त्यांनी खुलाशात चौकशी अहवाल मान्य नसल्याचे व नोटीस मागे घेऊन प्रस्तावित शास्ती रद्द करण्याची विनंती केलेली आहे. मात्र चौकशी अधिका-यांनी चौकशी पुर्ण करुन आरोप सिध्द होत असल्याचे निष्कर्ष काढले. श्री.रास्ते हे चौकशी नंतरही पुन्हा १२२ दिवस विनापरवाना गैरहजर होते. यावरुन त्यांच्या हजेरीत सुधारणा होत नसल्याचे स्पष्ट झाले आहे. त्यामुळे रास्ते यांना सेवेतून काढून टाकण्यास मान्यता घेणेकामी मनपा प्रशासनाने प्रकरण मा.स्थायी समिती सभेपुढे सादर केले असता स्थायी समिती सभेने ठराव क्रमांक १६१११, दिनांक. २२.११.२००६ अन्वये श्री. अनिल किसन रास्ते, गटरकुली यांना सेवतून काढून टाकण्याऐवजी त्यांना वर्तनात सुधारणा करण्याची एक संधी मिळावी, यास्तव त्यांची एक वेतनवाढ स्थगित करुन सेवेत ठेवण्यात यावे, असा ठराव क्र. १६१११ दि. २२.११.२००६ पारीत केलेला आहे.

उक्त ठराव संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आला आहे. परंतु या प्रकरणी पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिकेकडून प्राप्त माहितीवरुन श्री. रास्ते यांच्या गैरहजेरीत जून,२००८ ते जानेवारी, २०१० या कालावधीत लक्षणीय सुधारणा झाल्याचे दिसून येत असल्याने, प्रस्तुत ठरावाचे निलंबन मागे घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पिंपरी-चिंचवड महापालिकेच्या आस्थापनेवरील श्री. अनिल किसन रास्ते यांना सेवेतून काढून टाकण्याऐवजी त्यांना वर्तनात सुधारणा करण्याची एक संधी मिळावी, यास्तव त्यांची एक वेतनवाढ स्थगित करुन त्यांना सेवेत ठेवण्याचा क्र. १६१११ दि. २२.११.२००६ हा स्थायी समितीने पारित केलेला ठराव संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये निलंबित केला होता. तथापी श्री. रास्ते यांची जून,२००८ ते जानेवारी, २०१० या कालावधीतील गैरहजेरीत झालेली लक्षणीय सुधारणा विचारात घेवून मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५१ (३) अन्वये शासनास प्राप्त अधिकारात संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये केलेले ठरावाचे निलंबन मागे घेवून स्थायी समिती ठराव क्र. १६१११ दि. २२.११.२००६ कायम करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी यांनी या आदेशाची अमंलबजावणी तात्काळ करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनिल कोठेकर)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव-(२), यांचे स्विय सहायक नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
४. कक्ष अधिकारी (संगणक शाखा) नगर विकास विभाग , मंत्रालय, मुंबई-३२ यांना सदर शासन निर्णय विभागाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यासाठी अग्रेषित.
५. निवडनस्ती, नगर विकास विभाग (नवि-२२), मंत्रालय, मुंबई-३२

D:\P I M P A R I CHINCHAWAD\Tharav\RASTE G.R..doc